**५. न वै स्वयं तदश्नीयादतिथिं यन्न योजयेत्।**
**धन्यं यशस्यायुष्यं स्वर्ग्यं वाऽतिथिपूजनम्।।**

**अन्वयः** - यत् स्वयं न अश्नीयात् तत् वै अतिथिं न भोजयेत्। धान्यं, यशस्, आयुष्यं, स्वर्ग्यं वा अतिथिपूजनम् (नाम)

**भाषांतर**-जे अन्न स्वतःसाठी खाण्यायोग्य नाही ते अन्न अतिथीस भरवू नये (कारण) अतिथी पूजनाने मनुष्य कीर्ती, यश, दीर्घायुष्य आणि स्वर्ग प्राप्ती करू शकतो.

कीर्ती मिळवून देणारी आणि स्वर्गापर्यंत पोहचवणारी उत्तम गोष्ट म्हणजे अतिथीपूजन होय.



# ४. वैद्यकीय सुभाषितानि-१



**१. समदोषः समाग्निश्च समधातुमलक्रियः ।**
**प्रसन्नात्मेन्द्रियमनाः स्वस्थः इत्यभिधीयते ।। (सुश्रुतः)**

**अन्वय** – समदोषः समाग्निः समधातुमलक्रियः प्रसन्नात्मेन्द्रियमनाः च स्वस्थ इति अभिधीयते ।

**भाषांतर**– आयुर्वेदानुसार शरीरातील वात–पित्त–कफ या तीन प्रकृती, जठराग्नी, सप्तधातु, विसर्जन क्रिया या समस्थितीत राहिल्यास मनुष्य निरोगी म्हटला जातो.

**२. परिश्रमो मिताहारो भूगतावश्विनी सुतौ ।**
**तावनादृत्य नैवाहं वैद्यमन्यं समाश्रये ।।**

**अन्वय** – परिश्रमः मिताहारः च (एतौ) भूगतौ अश्विनी–सुतौ । एतौ (द्वौ) अनादृत्य अन्यं वैद्यम् अहं न समाश्रये ।

**भाषांतर** – शारीरिक–परिश्रम आणि मिताहार हे दोन ही या पृथ्वीवर आलेले अश्विनीकुमाराप्रमाणे आहेत. हे दोनही सोडून मी दुसऱ्या कुठल्याही वैद्याकडे जाणारच नाही.

अश्विनी–कुमार हे देवांचे वैद्य होय. या दोघांची तुलना भूतलावरील परिश्रम आणि मिताहारासोबत केली आहे. आहार जर मर्यादित ग्रहण केला तर मनुष्य आळसापासून दूर राहून उत्साहाने कार्य करेल व त्याचे शरीर शारीरिक व मानसिकदृष्ट्या निरोगी राहील व त्यास कोणत्याच दुसऱ्या वैद्याची गरज भासणार नाही.



**३. मनःशौचं कर्मशौचं कुलशौचं तथैव च ।**
**शरीरशौचं वाक्शौचं शौचं पञ्चविधं स्मृतम् । (महाभारतम्)**

**अन्वय -** मनःशौचं कर्मशौचं कुलशौचं शरीरशौचं तथा एव वाक्-शौचं च (एवं) शौचं पञ्चविधं स्मृतम्।

**भाषांतर -** निरोगी जीवन जगण्यासाठी मनुष्याने शारीरिक शुद्धता ठेवणे जसे गरजेचे आहे त्याप्रमाणेच मनाची शुद्धता, कर्माची शुद्धता, सदाचाराने कुळाची शुद्धता व वाणीची शुध्दता या सर्व गोष्टी पाळणे तेवढ्याच आवश्यक आहे. याद्वारे मनुष्य आणि सोबत समाजही निरोगी राहू शकतो.

**४. धर्मार्थकाममोक्षणामारोग्यं साधनं यतः।**
**तस्मादारोग्यदानेन तद्दत्तं स्याच्चतुष्टयम्।।**

**(स्कंदपुराणम्)**

**अन्वय -** यतः आरोग्यं धर्म-अर्थ-काम-मोक्षाणां साधनम् (अस्ति) तस्मात् आरोग्यदानेन तत् चतुष्टयम् (अपि) दत्तं स्यात्।

**भाषांतर-** या श्लोकात आरोग्यदानाचे श्रेष्ठत्व प्रतिपादित केले आहे. मनुष्याच्या जीवनाचे परमध्येय असलेला पुरुषार्थ प्राप्त करून देण्यासाठी आरोग्य हे अत्यंत महत्त्वाचे साधन आहे. आरोग्यच चांगले नसेल तर पुरुषार्थ प्राप्तीचा विचारही मनात येणार नाही. एखाद्यास आरोग्य प्रदान करू शकलो तर त्यास पुरुषार्थ प्राप्तीची संधी प्रदान केल्यासारखे होईल.

**५. धन्यानामुत्तमं दाक्ष्य धनानामुत्तमं श्रुतम्।**
**लाभानां श्रेष्ठमारोग्यं सुखानां तुष्टिरुत्तमा।।**

**(महाभारतम्)**

**अन्वय -** धन्यानां दाक्ष्यम् उत्तमं, धनानां श्रुतम् उत्तमं, लाभानाम् आरोग्यं श्रेष्ठं, तुष्टिः सुखानाम् उत्तमा।

**भाषांतर-** स्वनामधन्य लोकांमध्ये दाक्षिण्य, धनांमध्ये विद्याधन, प्राप्तव्यांमध्ये आरोग्य प्राप्ती सुखांमध्ये मानसिक तुष्टि या श्रेष्ठ मानल्या आहेत.

तात्पर्य, सर्वांनी या श्रेष्ठतत्वाच्या प्राप्तीसाठी प्रयत्नरत राहावे.

✦✦✦





# ५. सङ्गीतप्रशंसा



**१. वीणावादनतत्त्वज्ञः श्रुतिजातिविशारदः ।**
**तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं नियच्छति ।**

**अन्वय –** वीणावादनतत्त्वज्ञः, श्रुतिजातिविशारदः तालज्ञः च (सः) अप्रयासेन मोक्षमार्गं नियच्छति।

**भाषांतर–** वीणावादनाचे तत्त्व जाणणारा, श्रुती, जाती आणि ताल यांचे ज्ञान असलेला माणूस प्रयासावाचून मोक्षमार्गाला जातो. (जाति = आजच्या थाट पद्धतीच्या पूर्वी असलेली राग वर्गीकरण पद्धती)

**२. गीतेन प्रीयते देवः सर्वज्ञः पार्वतीपतिः ।**
**गोपीपतिरनन्तोऽपि वंशध्वनिवशंगतः ।।**
**सामगीतिरतो ब्रह्मा वीणासक्ता सरस्वती ।**
**किमन्ये यक्षगन्धर्वदेवमानवाः ।।**

**अन्वय –** सर्वज्ञः पार्वतीपतिः देवः गीतेन प्रीयते। गोपीपतिः अनन्त अपि वंशध्वनिवशंगत। ब्रह्मा सामगीतिरतः अस्ति। सरस्वती वीणासक्ता। (तदा) यक्षगन्धर्वदेवमानवाः किम्?



**भाषांतर–**सर्वज्ञ आणि पार्वतीपती शंकर गीताने प्रसन्न होतो. अनंत असा गोपीपती श्रीकृष्णही वेणुवादन मग्न होतो ब्रह्मदेवाला सामगान आवडते. सरस्वतीलाही वीणावादन

आवडते मग यक्ष, किन्नर गंधर्व देव दानव मानव यांच्या संगीतरुचीबद्दल काय सांगावे.

**३. चैतन्यं सर्वभूतानां विवृतं जगदात्मना ।**
**नादब्रह्म तदानन्दद्वितीयमुपास्महे ।।**

**अन्वय -** यत् सर्वभूतानां चैतन्यं, जगदात्मना विवृतं तद् अद्वितीयम् आनन्दं नादब्रह्म उपास्महे ।

**भाषांतर-**जे सर्वभूतांचे चैतन्य आहे आणि जे जगदात्म्याने व्यापले आहे. अशा त्या अद्वितीय आनंदमय नादब्रह्माची आम्ही उपासना करतो.



**४. पशुशिशुमृगोऽपि नादेन परितुष्यति ।**
**अतो नादस्य माहात्म्यं व्याख्यातुं केन शक्यते ।।**

**अन्वय -** पशुशिशुमृगः अणि नादेन परितुष्यति । अतः नादस्य माहात्म्यं व्याख्यातुं केन शक्यते ।

**भाषांतर-**हरिणाचे पाडस देखील संगीताने संतुष्ट होते. तेव्हा संगीताची महती सांगण्यास कोण समर्थ आहे बरे?

**५. नाहं वसामि वैकुण्ठे भक्तानां हृदयेऽपि न ।**
**मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ।।**

**अन्वय -** हे नारद, अहं वैकुण्ठे न वसामि । भक्तांना हृदये अपि न (वसामि) ।यत्र मद्भक्ताः गायन्ति तत्र (अहं) तिष्ठामि ।



**भाषांतर-**हे नारदा, मी वैकुंठात राहत नाही आणि भक्ताच्या अंतःकरणातही राहत नाही. जिथे माझे भक्त गायन करतात तिथेच मी राहतो.

✦✦✦

# ६. वैद्यकीय सुभाषितानि – २

**शीतोष्णे चैव वायुश्च त्रयः शारीरजाः गुणाः ।**
**तेषां गुणानां साम्यं यत्तदाहुः स्वास्थ्य–लक्षणम् ।।**

**(महाभारतम्)**

**अन्वय –** शीतोष्णे च एव वायुः च (एते) त्रयः शारीरजाः गुणाः सन्ति। तेषां गुणानां यत् साम्यं तत् स्वास्थ्य–लक्षणम् इति आहुः ।

**भाषांतर –** कफ, पित्त आणि वात या प्रकृतींना त्यांच्या स्वभावानुसार अनुक्रमे शीत, उष्ण आणि वायू असे नामाभिधान प्रस्तुत श्लोकात केले आहे. शरीर निरोगी राहण्यासाठी या तीनही प्रकृती समप्रमाणात राहणे अनिवार्य आहे हेच स्वास्थ्य लक्षण होय.

**शनैरर्थः शनैः पन्थाः शनैः पर्वतमारुहेत् ।**
**शनैर्विद्या च धर्मश्च व्यायामाश्च शनैः शनैः ।।**

**(चाणक्यनीतिः)**

**अन्वय –** शनैः अर्थः (उपभोग्यः) । शनैः पन्था (गम्यः) । शनैः पर्वतम् आरुहेत् । शनैः विद्या (अधिगम्या) च शनैः धर्मः (सम्पादनीयः) । व्यायामाः च शनैः शनैः (कर्तव्याः)

**भाषांतर–** उधळपट्टी न करता आवश्यकतेनुसार धनाचा उपभोग घ्यावा. एकाचवेळी जास्त प्रवास न करता सावकाश करावा त्यामुळे शारीरिक थकवा न येता उत्साह कायम राहतो. पर्वतावर चढतांना काळजीपूर्वक चढावे. विद्या ही एकाग्रतेने आत्मसात करावी. धर्माचे आचरण कोणाच्या तरी उपयोगासाठी करावे. व्यायाम हा जास्त लाभ प्राप्त करण्याच्या आशेने एकाचवेळी, थकवा येईपर्यंत न करता प्रत्येक दिवशी सावकाश वाढवत नेऊन करावा तर त्याचा योग्य लाभ मिळतो.

**यथा सिंहः गजो व्याघ्रो भवेद् वश्यः शनैः शनैः ।**
**तथैव सेवितो वायुरन्यथा हन्ति साधकम् ।।**

**(हठयोगप्रदीपिका)**

**अन्वय –** सिंहः गजः व्याघ्रः यथा शनैः शनैः वश्यः भवेत् तथा एव वायुः 
(शनैः शनैः) सेवितः अन्यथा (वायुः) साधकं हन्ति ।

**भाषांतर –** प्राणायामाचा त्वरीत लाभ मिळविण्यासाठी साधक अतिप्रमाणात वायूचे रेचक, पूरक करतात. पण त्यामुळे त्यांना लाभ न मिळता उलट त्यांची हानी होते. म्हणून

हठयोगप्रदीपिकाकार स्वात्माराम सूरी लिहितात की ज्याप्रमाणे हिंस्रपशूंना बळाने नाही तर प्रयत्नांनी सावकाश नियंत्रणात आणता येते तद्वत् प्राणवायूलाही प्रयत्नपूर्वक क्रमाने नियंत्रणात आणावे.

**दृष्टिपूतं न्यसेत् पादं वस्त्रपूतं पिबेत् जलम्।**
**सत्यपूतां वदेद् वाचं मनःपूतं समाचरेत्।।**

**(मनुस्मृतिः)**

**अन्वय –** दृष्टिपूतं पादं न्यसेत्। वस्त्रपूतं जलं पिबेत्। सत्यपूतां वदेत् वाचम्। मनःपूतं समाचरेत्। गमनसमये सम्यक दृष्ट्वा पादक्षेपः भवेत्।

**भाषांतर –** पारखल्याशिवाय, तपासल्याशिवाय, कोणतेही वक्तव्य करू नये ते हानीकारकच ठरते. तसेच अन्य लोक करतात, सांगतात म्हणून तसं वागू नये. आपल्या मनाला पटेल, रुचेल तसंच आचरण करावे.

**सर्वमेव परित्यज्य शरीरमनुपालयेत्।**
**शरीरस्य प्रणष्टस्य सर्वमेव विनश्यति।।**

**(चाणक्यः)**

**अन्वय –** सर्वम् एवं परित्यज्य शरीरम् अनुपालयेत्। (यतो हि) प्रनष्टस्य शरीरस्य सर्वम् एव विनश्यति।

**भाषांतर –** 'शरीरम् आद्यं खलु धर्मसाधनम्' अर्थात् जगातील धर्माचे फळ प्राप्त करून देण्यासाठी शरीर हे एकमेव साधन आहे. म्हणूनच त्याचा नाश म्हणजे सर्व गोष्टींचा नाश होय. सर्व कार्य सोडून प्रथम शरीराची काळजी घ्यावी.



# ७. रामायणं महाभारतं च

**१. यथाशक्ति चिकीर्षन्ति यथाशक्ति च कुर्वते ।**
**न किञ्चिदवमन्यन्ते नराः पण्डितबुद्धयः ।।**

**(महा.उद्यो – ३३–२१)**

**अन्वय –** पण्डितबुद्धयः नराः यथाशक्ति चिकीर्षन्ति, यथाशक्ति च कुर्वते, किञ्चित् न अवमन्यन्ते ।

**भाषांतर–** श्रेष्ठ पण्डित स्वशक्तीनुसार इच्छा करतात. स्व सामर्थ्यानुसारच कार्य करतात. विद्वान कधीही कोणत्याच गोष्टीचा अपमान करत नाहीत.

**२. एको धर्मः परं श्रेयः क्षमैका शान्तिरुत्तमा ।**
**विद्यैका परमा तृप्तिः अहिंसैका सुखावहा ।।**

**(महा.उद्यो – ३३–५२)**

**अन्वय –** एकः धर्मः परं श्रेयः एका क्षमा उत्तमा शान्तिः, एका विद्या परमा तृप्तिः, एका अहिंसा सुखावहा ।

**भाषांतर –** एकच धर्म श्रेष्ठ आहे तो म्हणजेच कल्याण, क्षमा हीच खरी उत्तम शान्ती, विद्या हीच श्रेष्ठ तृप्ती, अहिंसा ही एकटीच सुखकारक होय.



**३. आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ।**
**आत्मैव चात्मनः साक्षी कृतस्याप्यकृतस्य च ।।**



**(महा.आनु. ६–२७)**

**अन्वय –** आत्मनः बन्धुः आत्मा एव, आत्मनः रिपुः आत्मा एव, आत्मनः कृतस्य अकृतस्यच साक्षी अपि आत्मा एव ।

**भाषांतर**- केलेल्या आणि न केलेल्या कर्मांचा साक्षी असणारा आत्मा हा आत्म्याचाच बन्धु असतो आणि त्याचाच शत्रूदेखील असतो.

**४. अवज्ञया न दातव्यं कस्यचिल्लीलयापि वा।**
**अवज्ञया कृतं हन्याद्दातारं नात्र संशयः ।।**

**(रामा. १-१३-३३)**

**अन्वय** - कस्यचित् अवज्ञया लीलया अपि वा न दातव्यम्। अवज्ञया कृतं दातारं हन्यात् अत्र न संशयः।

**भाषांतर** - विनोद म्हणून सुद्धा कोणालाही अवमानित करून दान देऊ नये. अवमानाने केलेले दान दात्याला नष्ट करते. यात मुळीच संशय नसतो.

**५. सुलभाः पुरुषाः राजन् सततं प्रियवादिनः ।**
**अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ।।**

**(रामा. ३-३७-२)**

**अन्वय** - राजन्। सततं प्रियवादिनः पुरुषाः सुलभाः।
अप्रियस्य पथ्यस्य च वक्ता श्रोता च दुर्लभः।

**भाषांतर** - सर्वदा गोड बोलणारे लोक सहजतया मिळतात. किन्तु कडु पण खरे बोलणारे लोक व ते ऐकणारे अत्यंत दुर्लभ असतात.





# ८. पर्यावरण-महत्त्वम्

**१. यत् ते मध्यं पृथिवि यच्च नभ्यं**
**यास्त ऊर्जस्तन्व: संबभूवु: ।**
**तासु नो धेह्यभि न: पवस्व**
**माता भूमि: पुत्रो अहं पृथिव्या: ।।**
**पर्जन्य: पिता स उ न: पिपर्तु ।**

**(अथर्ववेदस्य पृथिवीसूक्तम् - १.२-१२)**

**अन्वय -** (हे) पृथिवि, यत् ते मध्यं यत् च नभ्यं याः ऊर्जः ते तन्वः संबभूवुः तासु नः धेहि, अभि नः पवस्व, भूमिः माता अहं पृथिव्याः पुत्रः (अस्मि), पर्जन्यः नः पिता (अस्ति) स उ नः पिपर्तु ।

**भाषांतर-** हे पृथिवीमाते, तुझ्या मध्यभागामध्ये,नाभिस्थानी तसेच शरीरातून प्रादुर्भूत होणाऱ्या पोषणयुक्त पदार्थांमध्ये आम्हाला स्थानापन्न करून पवित्र करावेस. ही धरणी आमची माता असून आम्ही सगळे तिचे पुत्र आहोत. तसेच पर्जन्य आमचा पिता आहे. त्यानेही आम्हाला संतुष्ट करावे.

**२. यत् ते भूमे विखनामि । क्षिप्रं तदपि रोहतु ।**
**मा ते मर्म विमृग्वरि मा ते हृदयमर्पिपम् ।।**

**(अथर्ववेदस्य पृथिवीसूक्तम्-१२. १-३५-२२)**

**अन्वय -**(हे) भूमे, यत् ते विखनामि तद् अपि क्षिप्रं रोहतु । (हे) विमृग्वरि ते मर्म (अहं) मा (अर्पिपम्) ते हृदयं मा अर्पिपम् ।

**भाषांतर-** हे धरणीमाते, जेव्हा आमच्याद्वारे (औषधी,कंद इ. मिळवण्यासाठी किंवा बीजारोपण करण्यासाठी) तुझे खनन करण्यात येईल तेव्हा ते सर्व त्वरीत अंकुरीत व्हावे आणि वाढीस लागावे. तसेच या खननकाळात आमच्याकडून तुझ्या मर्मस्थानाला किंवा हृदयाला कोणत्याही प्रकारची इजा होऊ नये.

**३. दशकूपसमा वापी, दशवापीसमो ह्रदः ।**
**दशह्रदसमः पुत्रो दशपुत्रंसमो वृक्षः ।। (वृक्षायुर्वेदः)**



**अन्वय -** वापी दशकूपसमः (अस्ति), ह्रदः दशवापीसमः (भवति), पुत्रः दशह्रदसमः (भवति), वृक्षः दशपुत्रसमः (अस्ति) ।

**भाषांतर-** वापी ही दहा कूपांप्रमाणे,सरोवर हा दहा वापींप्रमाणे, पुत्र हा दहा सरोवरांप्रमाणे आणि वृक्ष हा दहापुत्रांप्रमाणे असतो.

**४. ऊष्मतो म्लायते पर्णम् त्वक्फलं पुष्पमेव च।**
**जलायते चैव शीतेन स्पर्शस्तेनात्र विद्यते ।।**

**(म.भा. १२-१७७-११)**

**अन्वय -** ऊष्मतः (वृक्षाणां) पर्णं त्वक् फलं पुष्पम् च म्लायते अपि शीर्यते च। तेन अत्रा स्पर्शः विद्यते।

**भाषांतर -** उष्णतेमुळे वृक्षांची पाने म्लान होतात, त्यांची साल वाळून जाते, फळे जुनी होतात आणि फूलें सुकून जातात आणि गळून पडतात। यावरून त्याना स्पर्शसंवेदना आहे (हे स्पष्ट आहे)

**५. वल्ली वेष्टयते वृक्षं सर्वतश्चैव गच्छति।**
**न ह्यदृष्टेश्च मार्गोऽस्ति तस्मात्पश्यन्ति पादपाः।।**

**अन्वय -** वल्ली वृक्षं वेष्टयते सर्वतः च गच्छति एव। अदृष्टेः मार्गः न अस्ति हि तस्मात् पादपाः पश्यान्ति।

**भाषांतर-** वेल वृक्षाला सर्व बाजूंनी वेढून टाकते आणि वृक्षावर सर्व बाजूंनी पसरतो, माणसाला जर दृष्टी नसेल तर त्याला योग्य मार्गाने जाता येणे शक्य नसते म्हणून वृक्षांना पाहता येते.

**६. पादैः सलिलपानं च व्याधीनामीप दर्शनम्।**
**व्याधिप्रतिक्रियत्वाच्च विद्यते रसनं द्रुमे ।।**

**अन्वय -** पादैः सलिलपानं च व्याधीनाम् अपि दर्शनम् व्याधिप्रतिक्रियत्वात् च रसनं द्रुमे विद्यते।

**भाषांतर -** वृक्ष आपल्या मूळांद्वारे (भूमीतील) जलांचे शोषण करून घेतात. तसेच त्यांच्यावर रोग पडलेलाही दिसून येतो इतकेच नव्हे तर रोगाचा प्रतिकार करण्याचे ही सामर्थ्य त्यांच्यामध्ये असते. यावरून वृक्षांना रसनेन्द्रिय आहे (हे स्पष्ट आहे)

**७. वक्त्रेणोत्पलनालेन यथोर्ध्वं जलमाददेत्।**
**तथा पवनसंयुक्तः पादैः पिबति पादपः ।।**

**अन्वय -** उत्पलनालेन वक्त्रेण यथा जलम् ऊर्ध्वम् आददेत्, तथा पवनसंयुक्त पादपः पादैः पिबति।



**भाषांतर -** एखाद्याने कमलाचा (पोकळ) देठ तोंडात घालून आणि त्याने पाणी वर ओढून घेतो; त्याप्रमाणे वायूच्या सहाय्याने वृक्ष आपल्या मुळांनी (भूमीतील) पाणी शोषून घेतात.

# १. प्रसिद्धमन्त्राः



**१. तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।**
**धियो यो नः प्रचोदयात् ।**

**पदच्छेद–** तत्, सवितुः, वरेण्यं, भर्गः, देवस्य, धीमहि। धियः, यः, नः, प्रचोदयात्।

**अन्वयः –** यः नः धियः प्रयोदयात्। (तस्य) सवितुः देवस्य तत् वरेण्यं भर्गः धीमहि।

**भाषांतर–** जो देव आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो त्या सविता देवतेच्या श्रेष्ठ तेजाचे आम्ही ध्यान करतो.

**२. समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।**
**समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ।।**

**पदच्छेदः –** समानी, वः, आकूतिः, समाना, हृदयानि, वः, समानम्, अस्तु, वः, मनः, यथा, वः सुसहासति।

**अन्वयः – वः याकूतिः समानी अस्तु । वः हृदयानि समाना (सन्तु) । वः मनः समानम् (अस्तु) ।**



**भाषांतर–** हे ऋत्विज आणि यजमान, ज्याप्रमाणे तुमच्या शोभनीय वस्तु समान आहेत. त्याप्रमाणेच तुमचे संकल्प समान असोत. तुमचे हृदय, हृदयातील भाव समान राहोत. तद्वतच तुमच्या मनातील संवेदनाही समान असोत.

**३. त्र्यबकं यजामहे सुगन्धिं पुष्टिवर्धनम्।**
**उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात्।।**

**पदच्छेदः** - त्र्यम्बकम्, यजामहे, सुगन्धिम्, पुष्टिवर्धनम्, उर्वारुकम्, इव, बन्धनात्, मृत्योः, मुक्षीय, मा, अमृतात्।

**अन्वयः** - सुगन्धिं पुष्टिवर्धनं त्र्यम्बकं यजामहे। (हे त्र्यम्बक) बन्धनात् उर्वारुकम् इव मृत्योः मुक्षीय। अमृतात् मा (अस्तु)

**भाषांतर**- चांगल्या यशाने युक्त व पुष्टि अशा कारक त्र्यम्बक रुद्राचे आम्ही यजन करतो. हे रुद्र! बन्धनातून काकडी जशी अनायास वेगळी होते. तसा मी मृत्युपासून वेगळा व्हावे. अमृतत्वापासून नव्हे.

**४. पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते।।**

**पदच्छेदः** - पूर्णम्, अदः, पूर्णम्, इदः, पूर्णात्, पूर्णम्, उदच्यते।
पूर्णस्य, पूर्णम, आदाय, पूर्णम्, एव, अवशिष्यते।।

**अन्वयः** - अदः पूर्णम्, इदं पूर्णात् पूर्णम् उदच्यते। पूर्णस्य
पूर्णम् आदाय पूर्णम् एव अवशिष्यते।
ओं शान्तिः। शान्तिः। शान्तिः।

**भाषांतर**- हे ब्रह्म पूर्ण आहे. त्याच प्रमाणे हे जग पूर्ण आहे. शून्यातून शून्य वजा केले. तर शून्यच शिल्लक राहते. सर्वत्र शान्ती असो.

**५. ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्।**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथाः मा गृधः कस्यस्विद्धनम्।।**

**पदच्छेदः** - ईशा, वास्यम्, इदम्, यत्, किम्, च, जगत्यम्म्, जगततेन, त्यक्तेन, भुञ्चीथाः, मा, गृधः, कस्यस्वित्, धनम्।।

**अन्वयः** - यत् किंच जगत्यां जगत् इदं सर्वम् ईशा वास्यम्।
तेन त्यक्तेन भुञ्जीथाः। कस्यस्वित् धनं मा गृधः।।



**भाषांतर**- सर्व जग ईश्वरमय आहे. त्याचा त्यागपूर्वक उपभोग घ्या. थोडासुद्धा लोभ करू नका.



# व्याकरण परिचय

## भाषेचे स्वरूप

संस्कृतभाषा ही व्याकरणशुद्ध आणि अत्यंत समृद्धभाषा आहे. या भाषेचे व्याकरण समजून घेतले असता भाषाविषय अवगत होण्यास सुलभ होतो.व्याकरणाने शुद्ध असलेल्या या भाषेत 'ऋषि' म्हणविल्या जाणाऱ्या आपल्या भारतीय शास्त्रज्ञांनी सर्व प्रकारचे शास्त्र निबद्ध करून ठेवलेले आहे.आजकालच्या आपल्या जीवनात अत्यंत आवश्यक असलेल्या भ्रमणध्वनीच्या निर्मितीमध्ये आपल्या भारतीय गणितज्ञ श्री भास्कराचार्यांनी प्रतिपादित केलेल्या 'अलगोरिदम्' म्हणविल्या जाणाऱ्या पद्धतीचाच उपयोग केला जातो, यावरून प्राचीनतम असलेल्या ह्या संस्कृतभाषेत अद्ययावत माहिती पुरविण्याची क्षमता दृष्टिगोचर होते.

ही भाषा पुरातनकाळी वेदवाङ्मयात उपयोजिली, तेव्हाचे तिचे स्वरूप आजच्यापेक्षा वेगळे होते म्हणून या भाषेचे स्वरूप वैदिक व लौकिक अशा दोन प्रकारांनी सांगितले जाते. वैदिक वाङ्मयात ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद या वेदसंहिता, आरण्यके,उपनिषदे परिशिष्टे, प्रातिशाख्य, वेदाङ्ग,निरुक्त, बृहद्देवता वगैरेंचा समावेश होतो. लौकिक संस्कृत भाषेचे देखील स्थूलमानाने दोन भेद करता येतात. एक वाङ्मय किंवा ललित साहित्याची भाषा व दुसरी वैज्ञानिक साहित्याची भाषा. सामान्य वाङ्मयात रामायण, महाभारत, पुराणे, महाकाव्ये, नीतिकाव्ये, उत्कीर्णकाव्ये, स्तोत्रे, नाटके, चम्पूकाव्ये, ऐतिहासिककाव्ये,गद्यग्रंथ, लोककथा, नीतिकथा, अद्भुतकथा वगैरेंचा अंतर्भाव होतो . व्याकरण, कोश, अलंकार,गणित,संगीत,ज्योतिष, शिल्प,नृत्य, चित्र, तत्त्वज्ञान,आयुर्वेद, धर्मशास्त्र, राज्यशास्त्र विमानशास्त्र हे सर्व वैज्ञानिक विभागात येतात.

लौकिक संस्कृतभाषेचे स्वरूप पाहत असता शब्दरूप, धातुरूप, विशेषण, संख्याशब्द, अव्यय, प्रत्यय,लिंग,वचन, विभक्ती यांचा विचार करणे आवश्यक ठरते. म्हणूनच त्यांचा संक्षिप्त परिचय येथे देण्यात आला आहे.

### १) शब्दरूप

शब्दाला संस्कृतमध्ये 'पद' असे म्हटले जाते. 'पद' ही संज्ञा शब्दाला प्राप्त होण्याकरिता त्या शब्दाला'सुप्' अर्थात् विभक्तीप्रत्यय किंवा तिङ् अर्थात् कालार्थ प्रत्यय जोडले असले पाहिजेत. 'सुप्तिङन्तं पदम्' अशी पदाची व्याख्या पाणिनींनी सांगितली आहे. विभक्तीप्रत्यय हे नाम, सर्वनाम, विशेषण यांना लावतात तर कालार्थ प्रत्यय हे धातूंना लावतात.

**उदा.** रामः पठति।

या वाक्यातील शब्दांना संस्कृतात **'पद'** ही संज्ञा प्राप्त झाली आहे.

## २) धातुरूप

**'धातू'** म्हणजे क्रियापदाचे मूळ रूप.जसे- हस्,पठ्,नम्,कृ. इत्यादी.काही धातु परस्मैपदी तर काही आत्मनेपदी प्रत्ययवाचक आहेत.

ज्या धातूंना परस्मैपदी प्रत्यय लागतात त्यांना **'परस्मैपदी धातू'** असे म्हणतात. व ज्यांना आत्मनेपदीप्रत्यय लागतात त्यांना **'आत्मनेपदी धातू'** असे म्हणतात. तसेच काही धातूंना दोनही प्रत्यय लागू शकतात, त्यांना **'उभयपदी धातू'** म्हणतात.

धातू अनेक आहेत. त्यांना दहा वर्गामध्ये विभागले आहे. या वर्गाना किंवा समूहांना 'गण' असे म्हणतात. या दहा गणांना व्याकरण प्रक्रियेनुसार २ गटात विभागले आहे. पहिल्या गटात १,४,६,१० या गणांचा समावेश आहे. दुसऱ्या गटात २,३,५,७,८,९ या गणांचा समावेश आहे.

**संस्कृतमध्ये शब्दांच्या पाच जाती केल्या आहेत-**

१) नाम २) सर्वनाम ३) विशेषण ४) क्रिया विशेषण ५) क्रियापद

**१) नाम-** कोणत्याही वस्तूची प्राथमिक ओळख करून देणारा शब्द म्हणजे 'नाम' असे होय.

**उदा.** गृहम्, वृक्षः,नदी इ.

**२) सर्वनाम-** नामाचा पुनरुच्चार टाळण्यासाठी ज्या शब्दांचा उपयोग करण्यात येतो त्यांना 'सर्वनाम' असे म्हणतात.

**उदा.** सः,सा,तद्,एषः, एषा,एतत् इ.

**३) विशेषण-** नाम किंवा सर्वनामाबद्दल विशेष माहिती सांगणाऱ्या शब्दाला 'विशेषण' असे म्हणतात.

**उदा.**विशालं गृहम्, हरितः वृक्षः, उन्नतः पर्वतः इ. यामध्ये विशाल इत्यादी शब्द विशेषणे आहेत.

**४) क्रियाविशेषण-** क्रियापदाबद्दल विशेष माहिती सांगणाऱ्या शब्दाला 'क्रियाविशेषण' असे म्हणतात.

**उदा.**मन्दं गच्छति,मधुरं गायति,उच्चैः हसति इ.यामध्ये मन्दं, मधुरं, उच्चैः ही क्रियाविशेषणे आहेत.



**५) क्रियापद-** ज्या शब्दाद्वारे क्रिया सूचित केली जाते त्या शब्दास 'क्रियापद' असे म्हणतात.

**उदा.** गच्छति, गायति, वदति इ.

नामाच्या लिंग, वचन व विभक्तीनुसार विशेषणाचे लिंग, वचन व विभक्ती यांच्या रूपांमध्ये बदल होतो.

**उदा.** श्वेतः अश्वः, हरिता लता, रक्तं पुष्पम्।

## ३) संख्याशब्द

जगातील केवळ संस्कृतभाषेतच मोठमोठया संख्या दर्शविणारे शब्द उपलब्ध आहेत. संख्याशब्द म्हणजे संख्यावाचक शब्द.

**उदा.** १-एकम्, २-द्वे, ३-त्रीणि, ४- चत्वारि, १०- दश इ.

संख्याशब्दही विशेषणांप्रमाणेच विवक्षित पदाच्या लिंग ,वचन व विभक्तीनुसार बदलतात.

**उदा.** एकः अश्वः, द्वे माले, चत्वारि पुष्पाणि.

## ४) अव्यय

ज्या शब्दांच्या रूपात कधीही कुठलाही विकार उत्पन्न होत नाही, अर्थात् ज्या शब्दांची रूपे सर्व लिंगात, सर्व विभक्तींमध्ये आणि तीनही वचनांमध्ये एकसारखीच असतात त्यांना 'अव्यय' असे म्हणतात.

**'सदृशं त्रिषु लिङ्गेषु सर्वासु च विभक्तिषु ।**
**वचनेषु च सर्वेषु यन्न व्येति तदव्ययम् ।।'**

**उदा.** चिरम्, कदा, उच्चैः,अभितः,परितः,मध्ये,कृते इ. स्वरादिगण, पठित शब्द तसेच निपातसंज्ञक शब्दांना अव्यय संज्ञा होते.

स्वरादि निपातमव्ययम् (१/२/३७)

प्राग्रीश्वरान्निपाताः चादयोऽसत्त्वे (१/४-५६/५७)

**अव्यये पाच प्रकारची आहेत-**

१) उपसर्ग २) क्रियाविशेषण ३) समुच्चयबोधक ४) मनोविकारसूचक ५) अन्य (प्रकीर्ण)

## ५) प्रत्यय



कुठल्याही शब्दाला संस्कृतमध्ये पद ही संज्ञा प्राप्त होण्यासाठी प्रत्ययांची जोड असावी लागते. म्हणूनच या भाषेत प्रत्ययांना महत्त्वाचे स्थान आहे. मूळशब्द +प्रत्यय या द्वारेच पद निर्माण होते. प्रत्यय अनेक आहेत. त्यांमध्ये विभक्तीप्रत्यय व कालार्थप्रत्यय

यांद्वारे पदसंज्ञा मिळते. ज्या शब्दास विभक्तीप्रत्यय लागतात त्या शब्दाच्या मूळ रूपास 'प्रातिपदिक' म्हणतात. परस्मैपदी व आत्मनेपदी असे कालार्थी प्रत्ययाचे प्रामुख्याने दोन प्रकार आहेत. कृत्,तद्धित्,उणादि, स्त्री इ. प्रमुख प्रत्यय आहेत.यापैकी धातूंना लागून क्रियास्वरूप व क्रियेशी संबंधित काही विशेष सांगणारे प्रत्यय कृत् प्रत्यय आहेत तर शब्दरूपांना लागून अर्थविशेष सांगणारे तद्धित प्रत्यय आहेत. स्त्रीत्व दर्शविण्याकरिता शब्दांना लागणारे प्रत्यय स्त्री प्रत्यय आहेत.

-कृत्-अन्तशब्द. कर्ता, भवनम्, स्थिति इ.

-तद्धित-अन्तशब्द. दाशरथि, वासुदेव,प्राधान्य इ.

-स्त्री प्रत्ययान्त शब्द. नदी, चटका,गौरी इ.

## ६) लिंग

संस्कृत भाषेत नामांचा प्रयोग लिंगानुसार होतो.

उदा. वृक्षः- पुल्लिंग, लता-स्त्रीलिंग, पुस्तकम्- नपुंसकलिंग.

लिंगाचे ज्ञान शब्दकोशाद्वारे किंवा अभ्यासाने करून घेणे योग्य ठरते. कधी कधी शब्दांचे लिंग आणि प्रत्यक्षलिंग वेगळे असू शकते.

**उदा.** कलत्रम्.

## ७) वचन

संस्कृतमध्ये तीन वचने आहेत. एकवचन, द्विवचन आणि बहुवचन.

**उदा.-** वृक्षः - एकवचन,वृक्षौ - द्विवचन, वृक्षाः - बहुवचन.

## ८) विभक्ती

संस्कृतभाषेत एकूण सात विभक्ती आहेत.

प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पञ्चमी, षष्ठी, सप्तमी अशा सात विभक्ती आहेत. यांपैकी 'षष्ठी' वगळता इतर विभक्तींना संस्कृतात 'कारक' अशी संज्ञा आहे.

| विभक्ती | त्यांचे अर्थ (प्रायः) | |
|---|---|---|
| प्रथमा | कर्ता | (कर्तृकारक) |
| द्वितीया | कर्म | (कर्मकारक) |
| तृतीया | करण | (करणकारक) |
| चतुर्थी | संप्रदान | (संप्रदानकारक) |
| पंचमी | अपादान | (अपादानकारक) |
| षष्ठी | संबंध | |

सप्तमी अधिकरण (अधिकरणकारक)

असे विभक्तींचे अर्थ होतात.

## ९) पुरुष

संस्कृतव्याकरणात तीन पुरुष सांगितले आहेत.

उत्तमपुरुष म्हणजे –मी व आम्ही.

मध्यमपुरुष म्हणजे तू व तुम्ही.

प्रथमपुरुष म्हणजे तो,ती,ते,हा,ही,हे . निर्जीव वस्तूंचा देखील तृतीयपुरुषात समावेश होतो यालाच मराठीत 'तृतीयपुरुष' म्हणतात.

## १०) उपसर्ग

संस्कृतभाषेत कधी कधी भाषेचे सौंदर्य वाढविण्यासाठी, अर्थपरिवर्तन करण्यासाठी किंवा विशेष अर्थ सांगण्यासाठी धातुपूर्वी उपसर्ग लावलेला दिसतो.या उपसर्गांची संख्या२२आहेत.

**उपसर्गा**:–प्र,परा,अप्,सम्,निस्,निर्,दुस्,दुर् वि, आङ्,अनु,अव,नि, अधि, अपि, अति,सु,उद्,अभि,प्रति,परि,उप.

**उदा.** गच्छति(जातो),आगच्छति(येतो),निर्गच्छति(बाहेर जातो), सरति(पुढे सरकतो),अनुसरति(अनुकरण करतो)

## वाक्य रचना

वाक्य म्हणजे अर्थवंत पदांचा समूह. या समूहातील प्रत्येक शब्दात परस्पर आकांक्षा, योग्यता व संनिधी असायला हवी. एक शब्द उच्चारल्यानंतर दुसरा शब्द काय असेल अशी उत्कण्ठा निर्माण करण्याच्या क्षमतेला 'आकांक्षा' असे म्हणतात. पदांमध्ये योग्य अर्थ प्रकट करण्याच्या क्षमतेला' योग्यता' असे म्हणतात. अशा प्रकारे आकांक्षा व योग्यता यांनी युक्त असलेले शब्द एकामागे एक व्यवधानरहितपणे किंवा वेळ न घालवता उच्चारले असता त्याला' संनिधी' असे म्हणतात. याचाच अर्थ आकांक्षा, योग्यता व संनिधी यांनी युक्त असलेल्या अर्थपूर्ण वाक्यात कर्ता, कर्म व क्रियापद हे प्रमुख अंश असतात.संस्कृतभाषेत तीन प्रकारे वाक्यरचना केली जाते.कर्तरिरचना, कर्मणिरचना आणि भावेरचना.



## कर्तरि रचना

कर्तरि रचनेत कर्ता प्रथमा विभक्तीत असतो. कर्म द्वितीया विभक्तीत व क्रियापद कर्त्याच्या पुरुष आणि वचनानुसार असते व वाक्य तयार होते.

**उदा.-** रामः पाठं पठति।

या वाक्यात 'राम' हा कर्ता प्रथमा विभक्तीत, 'पाठम्' हे कर्म द्वितीया विभक्तीत व 'पठति' हे क्रियापद तृतीयपुरुष एकवचनात असलेल्या 'राम' या कर्त्यानुसार आहे.

**कर्तरि क्रियापदाची रचना-**

उपसर्ग + धातु + विकरण + परस्मैपदी/आत्मनेपदी प्रत्यय = क्रियापदरूप

पठ्+अ+ति=पठति

## कर्मणि रचना

कर्मणि रचनेत कर्म प्रथमा विभक्तीत , कर्ता तृतीया विभक्तीत क्रियापद कर्माच्या पुरुष वचनानुसार असते.

**उदा.** रामेण पाठः पठ्यते।

या वाक्यात 'पाठः' हे कर्म प्रथमाविभक्तीत, 'रामेण'हा कर्ता तृतीया विभक्तीत व पठ्यते हे क्रियापद तृतीयापुरुषी एकवचनी असलेल्या 'पाठः' या कर्मानुसार आहे.

**कर्मणि क्रियापदाची रचना-**

(उपसर्ग)+धातु+य+आत्मनेपदी प्रत्यय = क्रियापदरूप

**उदा.** पठ्+य+ते=पठ्यते।

## भावे रचना

ज्या वाक्यात क्रियापदाला कर्माची अपेक्षा नसते म्हणजेच वाक्यात जेव्हा अकर्मक क्रियापदे असतात तेव्हा कर्तरीहून अन्यप्रकारच्या वाक्यरचनेला'भावे रचना'असे म्हणतात.

**उदा.** कतरि रचना- अहं गच्छामि।

भावे रचना- मया गम्यते।

भावेरचनेचे क्रियापदरूप-अकर्मकधातु+य+आत्मनेपदी प्रत्यय=क्रियापदरूप याची रचना कर्मणि सारखीच असते. पण वाक्य कर्मरहित असते.

**शब्दरूपनिर्मिती-**

शब्दरूपनिर्मिती शिकण्यापूर्वी प्रथम वर्णांचा विचार करु या.संस्कृत भाषेतील स्वर पुढीलप्रमाणे आहेत. अ,इ,उ,ऋ,ए,ऐ,ओ,औ,ऋ,लृ यांना 'अच्' अशी संज्ञा आहे. क ते ह पर्यंत व्यंजने आहेत त्यांना 'हल्' अशी संज्ञा आहे. या स्वर-व्यंजन वर्णसमूहापासून शब्दाला पद संज्ञाप्राप्त होण्याकरिता, तो विभक्तीप्रत्यय किंवा कालार्थ प्रत्ययांनी युक्त असणे आवश्यक आहे. विभक्तीप्रत्ययांना 'सुप्' असे म्हणतात. विभक्तींचे प्रत्यय व त्यांचे अर्थ पुढीलप्रमाणे-

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन | |
|---|---|---|---|---|
| प्रथमा | सु | औ | जस् | कर्ता |
| द्वितीया | अम् | औट् | शस् | स/ते/स/ला/ना/ते |
| तृतीया | टा | भ्याम् | भिस् | ने/शी/नी/शी |
| चतुर्थी | ङे | भ्याम् | भ्यस् | साठी/करिता |
| पञ्चमी | ङसि | भ्याम् | भ्यस् | ऊन/हून/पासून |
| षष्ठी | ङस् | ओस् | आम् | चा/ची/चे |
| सप्तमी | ङि | ओस् | सुप् | इत/आत/वर |

**उदा.** राम+सु=रामः

अशाप्रकारे प्रत्यय लागून प्रक्रिया होऊन शब्द/पद निर्माण होते.

## १०) समास

समास म्हणजे दोन किंवा अधिक शब्दांचा एकसंघ शब्द बनविणे. बहुतेक भाषांमध्ये अशी रचना कमी अधिक प्रमाणात आढळते. ह्या रचनेने सुटसुटीतपणा,तर काही वेळेला भाषेत आकर्षकपणाही येतो. संस्कृतमध्ये समासरचनेचा वापर विपुल आणि विविधप्रकारचा आहे. समास रचनेमुळे थोडक्यात अधिक आशय व्यक्त करणे सहज शक्य होते. बहुधा विभक्तिप्रत्ययांचा तर काही समासरचनेत संपूर्ण शब्दांचाही लोप झालेला असतो. समासाचा अर्थ स्पष्ट करणाऱ्या विवरणवाक्याला 'विग्रह' म्हणतात.

**उदा.** सामासिकशब्द- दशरथपुत्रः।

विग्रहवाक्य- दशरथस्य पुत्रः।

समासाचे चार प्रकार आहेत.

१) अव्ययीभावसमास

२) तत्पुरुषसमास

३) द्वंद्वसमास

४) बहुव्रीहिसमास

**१) अव्ययीभावसमास-**

'प्रायेण पूर्वपदप्रधानः अव्ययीभावः'। याचाच अर्थ अव्ययीभाव समासातील पहिलं पद प्रधान म्हणजेच मुख्य आणि बहुधा अव्यय (उपसर्ग किंवा निपात) आणि उत्तरपद संज्ञा/नाम असते. त्यामुळे ते संपूर्ण पद अव्ययरूपच होतं. हा सामासिकशब्द नपुंसकलिंग एकवचनातच असतो.समासाचे पूर्वघटक अव्ययांचे -प्रति,अनु,यथा,उप इत्यादींचे सर्वव्याप्ती,योग्यता,साजेसा,सामीप्य इत्यादि अर्थ विग्रहात दाखवले जातात.

**उदा.** प्रतिग्रामम् -ग्रामं ग्रामं प्रति।

उपकृष्णम्- कृष्णस्य समीपम्।

**२) तत्पुरुषसमास-**

'प्रायेण उत्तरपदप्रधानस्तत्पुरुषः।' ज्या समासातील उत्तरपद हे प्रधान असते. आणि पूर्वपद विशेषणरूपाने उत्तरपदाच्या वैशिष्ट्याचा बोध करवून देते त्याला' तत्पुरुष समास' असे म्हणतात.

**उदा.** राज्ञः पुरुषः=राजपुरुषः। या ठिकाणी पूर्वपदी असलेले 'राज' हे पद विशेषण असून उत्तरपदी असलेले 'पुरुषः' प्रधान आहे.

कर्मधारयसमास, द्विगुसमास, नञ्तत्पुरुषसमास, प्रादितत्पुरुषसमास, उपपदतत्पुरुषसमास, गतितत्पुरुषसमास इ. समासप्रकार याच समासप्रकारांमध्ये येतात.

विभक्ती तत्पुरुष समास-

**उदा.** ग्रामं गतः = ग्रामगतः।

दण्डेन भग्नः = दण्डभग्नः।

देवेभ्यः दत्तम् = देवदत्तम्।

दशरथस्य पुत्रः = दशरथपुत्रः।

कूपे पतितः = कूपपतितः।

कर्मधारय समास- याचे सुद्धा अनेक प्रकार आहेत.

१) विशेषणपूर्वपद कर्मधारय समास-उदा. नीलघटः, कृष्णसर्पः इ.

२) उपमानपूर्वपद कर्मधारय समास-उदा. मेघश्यामः, सिंहबलम्, चन्द्रमुखम् इ.

**३) द्वंद्वसमास-**

'प्रायेण उभयपदप्रधानः द्वन्द्वः।' या समासात पूर्वपद आणि उत्तरपद ही दोन्हीं पदं प्रधान असतात. तसेच विग्रह करतांना 'च' या अव्ययाद्वारे दोन्हीं पद जोडली जातात. या सामासिकपदात साधारणतः दोन किंवा त्यापेक्षा जास्त पदेही असू शकतात.

**उदा.** रामलक्ष्मणौ-रामः च लक्ष्मणः च। मातापितरौ-माता च पिता च।

द्वंद्वसमासाचे तीन प्रकार आहेत.

१) इतरेतर द्वंद्व २) समाहारद्वंद्व ३) एकशेषद्वंद्व



**४) बहुव्रीहिसमास-**

'अन्यपदार्थप्रधानः बहुव्रीहिः।' या समासात सामासिक पदाला महत्त्व नसून तिसऱ्याच पदाला प्राधान्य असते. दोन किंवा त्याहून अधिक पदे एकत्रित येऊन एक समस्तपद या समासात तयार होते. ते पद विशेषण होऊन त्या दोन पदांच्या स्वतंत्र अर्थापेक्षा वेगळा

अर्थ प्रकट करते. या सामासिकपदाचा विग्रह करतांना 'यत्-तत्' या सर्वनामरूपांचा साधारणतः उपयोग केला जातो.अर्थानुसार व लिंगानुसार त्यांची विभक्तीरूपे विग्रहामध्ये योजिली जातात.

**उदा.** पीताम्बरः-पीतम् अम्बरम् यस्य सः पीताम्बरः।(श्रीकृष्णः)

चन्द्रशेखरः- चन्द्रः शेखरे यस्य सः चन्द्रशेखरः।(शिवः)

## ११) संधी

दोन किंवा तीन वर्णांचे एकत्रीकरण म्हणजे संधी. संधीचा अर्थ जोडणे असा होतो. संस्कृतभाषेत प्रत्येक शब्दाच्या शेवटी कोणता तरी स्वर, कोणते तरी व्यंजन किंवा अनुस्वार अथवा विसर्ग नियमाने असतोच.या शब्दापुढे दुसरा शब्द आला असता पूर्वीच्या शब्दातील शेवटच्या स्वरामध्ये,व्यजंनामध्ये,विसर्गामध्ये किंवा अनुस्वारामध्ये जे परिवर्तन होते त्याला'संधी' असे म्हणतात.

संधी होत असतांना कधी-कधी दोन वर्णांच्या जागी नवीनवर्ण येतो.

**उदा.** रमा+ईशः=रमेशः।

कधी-कधी दोन वर्णांमध्ये एखाद्या नवीन वर्णाचा समावेश होतो.

**उदा.** धावन्+अश्वः=धावन्नश्वः।

कधी-कधी एखाद्या वर्णाचा लोप होतो.

**उदा.** छात्राः+गच्छन्ति=छात्रा गच्छन्ति।

**संधीचे तीन प्रकार आहेत-**

१) स्वरसन्धिः

२) व्यंजनसन्धिः

३) विसर्गसन्धिः

आता प्रत्येक संधिचे प्रकार थोडक्यात जाणून घेऊ.

## स्वरसंधी

दोन स्वर एका पाठोपाठ एक आले असता स्वरसंधी होते. स्वरसंधीचे आठ प्रकार आहेत. ते पुढीलप्रमाणे-

१) सवर्णदीर्घसंधी २) गुणसंधी

३) वृद्धिसंधी ४)यण संधी



५)अयवायाव संधी ६)पूर्वरूप संधी

७)पररूपसंधी ८)प्रकृतिभाव संधी

या संधीबाबतचे मुख्य नियम पुढीलप्रमाणे-

**१)सवर्णदीर्घसंधी**

नियम- ह्रस्व किंवा दीर्घ अ,इ,उ,ऋ या स्वरां पुढे जर ह्रस्व किंवा दीर्घ सवर्ण स्वर आला तर त्या दोन स्वरांच्या ठिकाणी त्याच जातीचा दीर्घ स्वर होतो. याला 'सवर्णदीर्घ संधी' असे म्हणतात.

**उदा.** सूर्य + अस्तः =सूर्यास्तः, अ +अ =आ
देव + आलयः =देवालयः, अ +आ=आ
विद्या + अर्थी = विद्यार्थी, आ+अ=आ
महिला+आश्रमः =महिलाश्रमः, आ+आ=आ

अशाप्रकारे मुनीच्छा,गिरीशः,महीशः,गुरूपदेशः इ.शब्द तयार होतात.

**२)गुणसंधी-**

अ किंवाआ यांच्या पुढे इ-ई,उ-ऊ,ऋ-ॠ किंवा ऌ हे स्वर असतील तर त्यानंतर लगेच येणाऱ्या दोन स्वरांच्या जागी अनुक्रमे ए,ओ,अर्,अल् हे गुणादेश होतात. या संधीला 'गुणसंधी' असे म्हणतात.

**उदा.** उप + इन्द्रः = उपेन्द्रः, अ+ए=ए
यथा +इष्टम् = यथेष्टम्, आ + इ=ए
गण+ईशः = गणेशः, अ+ई=ए
रमा+ईशः = रमेशः, आ+ई=ए

अशाप्रकारेच चन्द्रोदयः,महोत्सवः, महर्षिः, राजर्षिः इ. शब्द तयार होतात.

**३) वृद्धिसंधी-**

'अ' किंवा 'आ' नंतर ए किंवा ऐ असेल तर दोघांचा 'ऐ' होतो. तसेच 'अ' किंवा 'आ' नंतर ओ किंवा औ असेल तर दोन स्वरांचा 'औ' होतो.

**उदा.** अत्र +एकः = अत्रैकः, अ +ए =ऐ
देव +ऐश्वर्यम् = देवैश्वर्यम्, अ +ऐ =ऐ
सा + एषा = सैषा, आ+ए = ऐ
कथा +ऐतिहासिकी = कथैतिहासिकी, आ+ ऐ =ऐ
तण्डुल +ओदनम् = तण्डुलौदनम्, अ+ ओ =औ
गङ्गा + ओघः = गङ्गौघः, आ +ओ =औ
देव +औदार्यम् = देवौदार्यम् , अ + औ =औ

दिव्या +औषधिः = दिव्यौषधिः, आ +औ =औ

**४) यण् संधी-**

यामध्ये जर इ, ई, उ, ऊ आणि ऋ,ॠ या स्वरांसमोर सवर्णस्वर सोडून कोणताही स्वर आला तर इ, ई ला 'य्',उ, ऊ ला 'व' ऋ,ॠला 'र्' ऌ ला 'ल्' असा आदेश होतो.

**उदा.** प्रति +एकः = प्रत्येकः,
दासी +एव = दास्येव,
पठतु +एकः = पठत्वेकः,
वधू +अत्र = वध्वत्र
पितृ +आदेशः = पित्रादेशः,
लृ +आकृतिः = लाकृतिः

**५) अयवायाव संधी-**

ए, ऐ, ओ, औ या नंतर जर कोणताही स्वर आला तर ए ला 'अय्', ऐ ला 'आय्', ओ ला 'अव् 'आणि औ ला 'आव् 'असे आदेश होतात. म्हणजेच ए, ऐ, ओ, औ या स्वरांच्या जागी क्रमशः अय्, आय्,अव्, आव् होतात.

**उदा.** हरे +ए = हरये,
भो +अति = भवति,
नै +अकः = नायकः,
पौ +अकः = पावकः।

**६) पूर्वरूपसंधी-**

पदाच्या (अर्थात् सुबन्त किंवा तिङन्त) अंती येणाऱ्या 'ए' किंवा 'ओ 'पुढे 'अ' आल्यास त्याला पूर्वरूप होतो. म्हणजे 'ए' किंवा 'ओ' होतो आणि 'अ' आहे हे सूचीत करण्यासाठी "ऽ" (अवग्रह) हे चिन्ह लिहितात.

**उदा.-** हरे +अव = हरेऽव,
रामो +अधुना = रामोऽधुना ।

**७)पररूपसंधी-**

अकारान्त उपसर्गापुढे एकारादि किंवा ओकारादि धातुचे रूप आले असता दोघांना (अ व ए किंवा ओ) पररूप एकादेश म्हणजे 'ए' किंवा 'ओ' होतो

**उदा.** प्र + एजते = प्रेजते,
उप + ओषति = उपोषति।

**८) प्रकृतिभावसंधी-**

दीर्घ ईकारान्त, उकारान्त आणि एकारान्त द्विवचनी रूपापुढे कोणताही स्वर आला असता संधिच्या नियमानुसार त्यांच्यात बदल होत नाही आणि ते शब्द मूळ रूपातच राहतात त्या स्थितीला 'प्रकृतिभाव' म्हणतात.



**उदा.** मुनी +इच्छतः = मुनी इच्छतः,
फले + एव = फले एव

## व्यंजनसंधी

व्यंजनसंधी ही 'हल्संधी'या नावानेही प्रसिद्ध आहे.

१) पहिल्या पाच वर्गापैकी अनुनासिकाशिवााय कोणतेही वर्गीय व्यंजन पदाच्या शेवटी आले आणि त्याच्यापुढे कोणत्याही वर्गाचा पहिला वर्ण असेल तर पूर्वीच्या व्यंजनाला त्याच वर्गाचे पहिले व्यंजन होते.(या संधीला 'प्रथम-व्यंजनसंधी' असेही म्हणतात.)

**उदा.** षड् + शास्त्रम् = षट्शास्त्रम्।
विपद् + कालः = विपत्कालः।

२) पहिल्या पाच वर्गातील पहिल्या व्यंजनापुढे अनुनासिकाशिवाय स्वर किंवा अन्य व्यंजन आले असता पहिल्या व्यंजनाचे त्याच वर्गातील तिसऱ्या व्यंजनात रूपांतर होते.(या संधीला 'तृतीय-व्यंजनसंधी 'असे म्हणतात.)

**उदा.** दिक् + अम्बरः = दिगम्बरः,
जगत् +ईशः = जगदीशः,
षट् + आननः = षडाननः।

३) पहिल्या पाच वर्गांतील कोणत्याही व्यंजनापुढे अनुनासिक आल्यास पहिल्या व्यंजनाचे त्याच वर्गातील अनुनासिक व्यंजनामध्ये रूपांतर होते.या संधीला 'अनुनासिकसंधी' असेही म्हणतात.)

**उदा.** वाक् +निश्चयः = वाङ्निश्चयः,
सत् + मतिः = सन्मतिः।

४) 'त् 'या व्यंजनापुढे' च् किंवा छ्' आल्यास 'त् ' ला 'च्' होतो.

**उदा.** सत् + चरित्रम् = सच्चरित्रम्,
उत् +छेदः = उच्छेदः।

५) 'त्' या व्यंजनापुढे 'ज् किंवा झ्' आल्यास 'त्' ला 'ज्' होतो.

**उदा.** सत् + जनः = सज्जनः

६) 'त्' या व्यंजनापुढे 'ट् किंवा ढ्' आल्यास' त् 'चा 'ट्' होतो.

**उदा.** तत् + टीका = तट्टीका

७) 'त्' या व्यंजनापुढे 'ल्' आल्यास 'त्' ला 'ल्' होतो.

**उदा.** तत् +लयः = तल्लयः,
तत् + लीनः = तल्लीनः।

८) 'त्' या व्यंजनापुढे 'श्' आल्यास 'त्' या वर्णाला 'च्' होतो.तसेच पुढील 'श्' ला 'छ्' होतो.



**उदा.** सत् + शिष्यः = सच्छिष्यः।

९) पदाच्या शेवटी येणाऱ्या 'म्' पुढे व्यंजन असेल तर त्या 'म्' ला अनुस्वार होतो,

आणि 'म्' पुढे स्वर असेल तर 'म्' स्वरामध्ये जोडला जातो.

उदा. सत्यम् + वद = सत्यं वद ।

ग्रामम् + आगतः = ग्राममागतः ।

१०) 'छ्' या वर्णापूर्वी ह्रस्व स्वर आला असता दोहोमध्ये 'च्' हा वर्ण येतो.

उदा. रत्न +छाया = रत्नच्छाया ।

## विसर्गसंधी

विसर्ग नेहमीच स्वराश्रित असतो. म्हणून विसर्गसंधीचा विचार करतांना विसर्गाच्या पूर्वी कोणता स्वर आहे , या गोष्टीचा विचार करावा लागतो. नंतर पुढे येणाऱ्या वर्णांना पाहून 'विसर्गसंधी' करावी लागते.

१) विसर्गाचा 'उ' होणे.

विसर्गाच्या पूर्वी 'अ' असून पुढे 'अ' हा स्वर किंवा मृदु व्यंजन आले तर त्या विसर्गाला 'उ' होतो. तो'उ' आणि पुर्वीचा 'अ' दोनही मिळून 'ओ' होतो, आणि अशा प्रसंगी 'ओ' च्या पुढे 'अवग्रह '(ऽ)असे चिन्ह लिहिण्याची पद्धत आहे.

उदा. रामः अस्ति = रामोऽस्ति ।

बालकः वदति = बालको वदति ।

२) विसर्गाला 'य्'होणे आणि विकल्पाने लोप होणे.

विसर्गाच्या पूर्वी 'अ' असून पुढे लगेच कोणताही स्वर असेल तर त्या विसर्गचा 'य्' होतो. 'य्' पुढे स्वर असतांना त्या 'य्' चा विकल्पाने लोप होतो. लोप झाल्यावर दोन स्वर एकत्र आले तर त्याची पुनः संधी होत नाही. 'य्' चा लोप केला नाही तर तो 'य' पुढच्या स्वरात मिसळतो.

उदा. सूर्यः उदेति = सूर्य उदेति किंवा सूर्ययुदेति ।

जनाः अवसन् = जना अवसन् किंवा जनायवसन् ।

३) विसर्गाचा लोप होणे.

(क) विसर्गाच्या पूर्वी 'आ' स्वर असेल व विसर्गापुढे 'ग्, न्, व् 'ही व्यंजने असतील तर विसर्गाचा लोप होतो.

उदा. जनाः हसन्ति= जना हसन्ति ।

बालकाः गच्छन्ति = बालका गच्छन्ति ।

(ख) 'सः' आणि 'एषः' यांच्यापुढे कोणतेही व्यंजन आले तर विसर्गाचा लोप होतो .



उदा. सः रामः = स रामः ।

एषः गच्छति = एष गच्छति ।

४) विसर्गाला 'र्' होणे.

विसर्गाच्या पूर्वी 'अ-आ' यांच्या व्यतिरिक्त कोणताही स्वर असून विसर्गाच्या पुढे

स्वर किंवा मृदु व्यंजन असेल तर विसर्गाला 'र्' होतो. तसेच त्या 'र्' नंतर स्वर असेल तर 'र्' स्वरात मिसळतो, आणि पुढे व्यंजन असेल तर 'र्' रेफाच्या रूपाने पुढील व्यंजनावर दिला जातो.

**उदा.** मुनिः + आगच्छति = मुनिरागच्छति ।

धेनूः + जयति = धेनूर्जयति ।

५) विसर्गाला 'श्, ष्, स्' होणे.

(क) विसर्गाच्या पूर्वी कोणताही स्वर असून पुढे 'च्' किंवा 'छ्' असेल तर 'श, ट् किंवा ठ्' असेल तर 'ष् व त् किंवा थ्' असेल तर 'स्' होतो.

**उदा.** निः + चलः = निश्चलः,

पतञ्जलेः + टीका = पतञ्जलेष्टीका,

सूर्यः + तपति = सूर्यस्तपति ।

(ख) विकल्पाने 'श्, ष्, स्' होणे.

विसर्गाच्या पूर्वी कोणताही स्वर असून जर विसर्गापुढे 'श्, ष्, स;' हे वर्ण असतील तर विसर्गाला अनुक्रमे 'श्, ष्, स्' हे आदेश विकल्पाने होतात.

**उदा.** कविः + शंसति = कविश्शंसति किंवा कविः शंसति ।

ऋतवः + षट् = ऋतवष्षट् किंवा ऋतवः षट् ।

गिरेः + सौन्दर्यम् = गिरस्सौन्दर्यम् किंवा गिरः सौन्दर्यम् ।

६) विसर्गाचा विसर्गच कायम राहणे.

विसर्गापूर्वी कोणताही स्वर आला असून विसर्गापुढे 'क्' किंवा 'ख्', प् किंवा फ्' या जोडीतले कोणतेही कठोर व्यंजन आले तर विसर्ग तसाच कायम राहतो.

**उदा.** कविः करोति = कविः करोति ।

कर्षकाः खनन्ति = कर्षकाः खनन्ति ।

ऋषिः पश्यति = ऋषिः पश्यति ।

अशाप्रकारे संधीची रूपे समजून घ्यावीत.



# शब्दरूपे (शब्दरूपाणि)

संस्कृत वाक्यांमध्ये येत असलेली पदे सुबन्त व तिङन्त या नावाने ओळखली जातात. 'सुप्'विभक्ती प्रत्यय ज्या शब्दस्वरूपाला लागतात त्या शब्दस्वरूपाला 'प्रातिपदिक' अशी संज्ञा आहे. प्रातिपदिकाच्या शेवटी असलेल्या वर्णानुसार शब्दरूपे तयार होतात. तीन लिंग व तीन वचनांमध्ये असणारी काही सुबन्त पदांची विभक्ती रूपे खालीलप्रमाणे असतात.

## अकारान्त पुँल्लिंग 'राम' शब्द

| विभक्ती | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा | रामः | रामौ | रामाः |
| द्वितीया | रामम् | रामौ | रामान् |
| तृतीया | रामेण | रामाभ्याम् | रामैः |
| चतुर्थी | रामाय | रामाभ्याम् | रामेभ्यः |
| पञ्चमी | रामात् | रामाभ्याम् | रामेभ्य : |
| षष्ठी | रामस्य | रामयोः | रामाणाम् |
| सप्तमी | रामे | रामयोः | रामेषु |
| सम्बोधन | हे राम | हे रामौ | हे रामाः |

**'राम' या शब्दाप्रमाणे चालणारे काही शब्द-**

| | | | |
|---|---|---|---|
| नरः- मनुष्य | भक्तः- भक्त | मयूरः- मोर | बालः- बालक |
| शिष्यः- शिष्य | पुत्रः- पुत्र | सूर्यः- सूर्य | जनकः- वडील |
| चन्द्रः- चंद्र | लोकः- लोक | नृपः- राजा | सुरः- देवत्ता |

## इकारान्त पुँल्लिंग 'हरि'शब्द (विष्णु )



| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्र. | हरिः | हरी | हरयः |
| द्वि. | हरिम् | हरी | हरीन् |
| तृ. | हरिणा | हरिभ्याम् | हरिभिः |

| | | | |
|---|---|---|---|
| च. | हरये | हरिभ्याम् | हरिभ्यः |
| पं. | हरेः | हरिभ्याम् | हरिभ्य : |
| ष. | हरेः | हर्योः | हरीणाम् |
| स. | हरौ | हर्योः | हरिषु |
| सं. | हे हरे | हे हरी | हे हरयः |

**'हरि'** या शब्दाप्रमाणे चालणारे काही शब्द-

कविः-कवी,अरिः-शत्रु,मुनिः-मुनी

## उकारान्त पुँल्लिङ्ग 'गुरु' शब्द (ज्ञान देणारा)

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्र. | गुरुः | गुरू | गुरवः |
| द्वि . | गुरुम् | गुरू | गुरून् |
| तृ. | गुरुणा | गुरुभ्याम् | गुरुभिः |
| च. | गुरवे | गुरुभ्याम् | गुरुभ्यः |
| पं. | गुरोः | गुरुभ्याम् | गुरुभ्य : |
| ष. | गुरोः | गुर्वोः | गुरूणाम् |
| स. | गुरौ | गुर्वोः | गुरुषु |
| सं. | हे गुरो | हे गुरू | हे गुरवः |

**'गुरु'** या शब्दाप्रमाणे चालणारे काही शब्द-

भानुः- सूर्य, विधुः- चंद्र, सेतुः- पुल

## अकारान्त नपुंसकलिङ्ग 'फल' शब्द

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्र. | फलम् | फले | फलानि |
| द्वि . | फलम् | फले | फलानि |

तृतीया पासून सप्तमी पर्यंत या शब्दाची रूपे अकारान्त पुंल्लिंग शब्दाच्या रूपाप्रमाणे चालतात.



| | | | |
|---|---|---|---|
| तृ. | फलेन | फलाभ्याम् | फलैः |
| च. | फलाय | फलाभ्याम् | फलेभ्यः |
| पं. | फलात् | फलाभ्याम् | फलेभ्य : |
| ष. | फलस्य | फलयोः | फलानाम् |

| | | | |
|---|---|---|---|
| स. | फले | फलयोः | फलेषु |
| सं. | हे फल | हे फले | हे फलानि |

'फल' या शब्दाप्रमाणे चालणारे काही शब्द-

वनम्-वन, पुस्तकम्- पुस्तक, जलम्- पाणी

### इकारान्त नपुंसकलिङ्ग 'वारि'शब्द (पाणी)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | वारि | वारिणी | वारीणि |
| द्वि. | वारि | वारिणी | वारीणि |

तृतीया पासून सप्तमी पर्यंत या शब्दाची रूपे इकारान्त पुंल्लिंग शब्दाच्या रूपाप्रमाणे चालतात.

| | | | |
|---|---|---|---|
| तृ. | वारिणा | वारिभ्याम् | वारिभिः |
| च. | वारिणे | वारिभ्याम् | वारिभिः |
| पं. | वारिणः | वारिभ्याम् | वारिभिः |
| ष. | वारिणः | वारिणोः | वारिणाम् |
| स. | वारिणि | वारिणोः | वारिषु |
| सं. | हे वारि, हे वारे | हे वारिणी | हे वारीणि |

### उकारान्त नपुंसकलिङ्ग 'मधु'शब्द (मध)

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्र. | मधु | मधुनी | मधूनि |
| द्वि. | मधु | मधुनी | मधूनि |
| तृ. | मधुना | मधुभ्याम् | मधुभिः |
| च. | मधुने | मधुभ्याम् | मधुभ्यः |
| पं. | मधुनः | मधुभ्याम् | मधुभ्यः |
| ष. | मधुनः | मधुनोः | मधूनाम् |
| स. | मधुनि | मधुनोः | मधुषु |
| सं. | हे मधु, हे मधो | हे मधुनी | हे मधुनि |



### आकारान्त स्त्रीलिंग 'लता' (बेल)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | लता | लते | लताः |
| द्वि. | लताम् | लते | लताः |
| तृ. | लतया | लताभ्याम् | लताभिः |

| | | | |
|---|---|---|---|
| च. | लतायै | लताभ्याम् | लताभ्यः |
| पं. | लतायाः | लताभ्याम् | लताभ्यः |
| ष. | लतायाः | लतयोः | लतानाम् |
| स. | लतायाम् | लतयोः | लतासु |
| सं. | हे लते | हे लते | हे लताः |

### इकारान्त स्त्रीलिंग ' मति ' शब्द (बुद्धी)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | मतिः | मती | मतयः |
| द्वि. | मतिम् | मती | मतीः |
| तृ. | मत्या | मतिभ्याम् | मतिभिः |
| च. | मत्यै, मतये | मतिभ्याम् | मतिभ्यः |
| पं. | मत्याः, मतेः | मतिभ्याम् | मतिभ्यः |
| ष. | मत्याः, मतेः | मत्योः | मतीनाम् |
| स. | मत्याम्, मतौ | मत्योः | मतिषु |
| सं. | हे मते | हे मती | हे मतयः |

### ईकारान्त स्त्रीलिंग 'नदी' शब्द

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | नदी | नद्यौ | नद्यः |
| द्वि. | नदीम् | नद्यौ | नदीः |
| तृ. | नद्या | नदीभ्याम् | नदीभिः |
| च. | नद्यै | नदीभ्याम् | नदीभ्यः |
| पं. | नद्याः | नदीभ्याम् | नदीभ्यः |
| ष. | नद्याः | नद्योः | नदीनाम् |
| स. | नद्याम् | नद्योः | नदीषु |
| सं. | हे नदि | हे नद्यौ | हे नद्यः |

### उकारान्त स्त्रीलिंग ' धेनु ' शब्द (गाय)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | धेनुः | धेनू | धेनवः |
| द्वि. | धेनुम् | धेनू | धेनूः |
| तृ. | धेन्वा | धेनुभ्याम् | धेनुभिः |
| च. | धेनवे, धेन्वै | धेनुभ्याम् | धेनुभ्यः |
| पं. | धेनोः, धेन्वाः | धेनुभ्याम् | धेनुभ्यः |

| | | | |
|---|---|---|---|
| ष. | धेनोः,धेन्वा | धेन्वोः | धेनूनाम् |
| स. | धेनौ, धेन्वाम् | धेन्वोः | धेनुषु |
| सं. | हे धेनो | हे धेनू | हे धेनवः |

## अस्मद् - मी,आम्ही, आपण

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | अहम् | आवाम् | वयम् |
| द्वि. | माम्, मा | आवाम्, नौ | अस्मान्, नः |
| तृ. | मया | आवाभ्याम् | अस्माभिः |
| च. | मह्यम्, मे | आवाभ्याम्, नौ | अस्मभ्यम्, नः |
| पं. | मत् | आवाभ्याम् | अस्मत् |
| ष. | मम, मे | आवयोः, नौ | अस्माकम्, नः |
| स. | मयि | आवयोः | अस्मासु |

## युष्मद् - तू,तुम्ही,आपण

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | त्वम् | युवाम् | यूयम् |
| द्वि. | त्वाम्, त्वा | युवाम्, वाम् | युष्मान्, वः |
| तृ. | त्वया | युवाभ्याम् | युष्माभिः |
| च. | तुभ्यम्, ते | युवाभ्याम् | युष्मभ्यम्, वः |
| पं. | त्वत् | युवाभ्याम् | युष्मत् |
| ष. | तव, ते | युवयोः वाम् | युष्माकम्, वः |
| स. | त्वयि | युवयोः | युष्मासु |

## तत् - पुंल्लिङ्ग (तो)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | सः | तौ | ते |
| द्वि. | तम् | तौ | तान् |
| तृ. | तेन | ताभ्याम् | तैः |
| च. | तस्मै | ताभ्याम् | तेभ्यः |
| पं. | तस्मात् | ताभ्याम् | तेभ्यः |
| ष. | तस्य | तयोः | तेषाम् |
| स. | तस्मिन् | तयोः | तेषु |

## तत् -नपुंसकलिङ्ग(ते)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | तत् | ते | तानि |
| द्वि | तत् | ते | तानि |

## तत् - स्त्रीलिंग(ती)

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | सा | ते | ताः |
| द्वि. | ताम् | ते | ताः |
| तृ. | तया | ताभ्याम् | ताभिः |
| च. | तस्यै | ताभ्याम् | ताभिः |
| पं. | तस्याः | ताभ्याम् | ताभ्यः |
| ष. | तस्याः | तयोः | तासाम् |
| स. | तस्याम् | तयोः | तासु |

## 'यत् 'सर्वनाम(जो, जी,जे)

### पुँल्लिंग

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | यः | यो | ये |
| द्वि. | यम् | यौ | यान् |
| तृ. | येन | याभ्याम् | यैः |
| च. | यस्मै | याभ्याम् | येभ्यः |
| पं. | यस्मात् | याभ्याम् | येभ्यः |
| ष. | यस्य | ययोः | येषाम् |
| स. | यस्मिन् | ययोः | येषु |

### स्त्रीलिंग

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | या | ये | याः |
| द्वि | याम् | ये | याः |
| तृ. | यया | याभ्याम् | याभिः |
| च. | यस्यै | याभ्याम् | याभ्यः |
| पं. | यस्याः | याभ्याम् | याभ्यः |
| ष. | यस्याः | ययोः | यासाम् |
| स. | यस्याम् | ययोः | यासु |

## किम् (कोण)- प्रश्नवाचक सर्वनाम

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | कः | कौ | के |
| द्वि. | कम् | कौ | कान् |
| तृ. | केन | काभ्याम् | कैः |
| च. | कस्मै | काभ्याम् | केभ्यः |
| पं. | कस्मात् | काभ्याम् | केभ्यः |
| ष. | कस्य | कयोः | केषाम् |
| स. | कस्मिन् | कयोः | केषु |

### स्त्रीलिंग

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | का | के | काः |
| द्वि. | काम् | के | काः |
| तृ. | कया | काभ्याम् | काभिः |
| च. | कस्यै | काभ्याम् | काभ्यः |
| पं. | कस्याः | काभ्याम् | काभ्यः |
| ष. | कस्याः | कयोः | कासाम् |
| स. | कस्याम् | कयोः | कासु |

## धातुरूपे (धातुरूपाणि)

यापुढे काही प्रसिद्ध धातूंची क्रियारूपे वर्तमानकाळ,भूतकाळ,भविष्यकाळ,आज्ञार्थ आणि विध्यर्थ अशाप्रकारे तीन पुरुष आणि तीन वचनांमध्ये दिली आहेत.

### भू (असणे, होणे) परस्मैदपदी धातुरूपे

#### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| भवति | भवतः | भवन्ति | प्रथमपुरुष |
| भवसि | भवथः | भवथ | मध्यमपुरुष. |
| भवामि | भवावः | भवामः | उत्तमपुरुष |



#### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| भविष्यति | भविष्यतः | भविष्यन्ति | प्र. |
| भविष्यसि | भविष्यथः | भविष्यथ | म. |
| भविष्यामि | भविष्यावः | भविष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| भवत् | अभवताम् | अभवन् | प्र. |
| अभवः | अभवतम् | अभवत | म. |
| अभवम् | अभवाव | अभवाम | उ. |

### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| भवतु | भवताम् | भवन्तु | प्र. |
| भव | भवतम् | भवत | म. |
| भवानि | भवाव | भवाम | उ. |

### विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| भवेत् | भवेताम् | भवेयुः | प्र. |
| भवेः | भवेतम् | भवेत | म. |
| भवेयम् | भवेव | भवेम | उ. |

## क्रीड् (खेळणे) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| क्रीडति | क्रीडतः | क्रीडन्ति | प्र. |
| क्रीडसि | क्रीडथः | क्रीडथ | म. |
| क्रीडामि | क्रीडावः | क्रीडामः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| क्रीडाष्यति | क्रीडाष्यतः | क्रीडिष्यन्ति | प्र. |
| क्रीडिष्यसि | क्रीडिष्यथः | क्रीडिष्यथ | म. |
| क्रीडिष्यामि | क्रीडिष्यावः | क्रीडिष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अक्रीडत् | अक्रीडताम् | अक्रीडन् | प्र. |
| अक्रीडः | अक्रीडतम् | अक्रीडत | म. |
| अक्रीडम् | अक्रीडाव | अक्रीडाम | उ. |



### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| क्रीडतु | क्रीडताम् | क्रीडन्तु | प्र. |
| क्रीड | क्रीडतम् | क्रीडत | म. |
| क्रीडानि | क्रीडाव | क्रीडाम | उ. |

### विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| क्रीडेत् | क्रीडेताम् | क्रीडेयुः | प्र. |
| क्रीडेः | क्रीडेतम् | क्रीडेत | म. |
| क्रीडेयम् | क्रीडेव | क्रीडेम | उ. |

## गम् (जाणे) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| गच्छति | गच्छतः | गच्छन्ति | प्र. |
| गच्छसि | गच्छथः | गच्छथ | म. |
| गच्छामि | गच्छाव | गच्छामः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| गमिष्यति | गमिष्यतः | गमिष्यन्ति | प्र. |
| गमिष्यसि | गमिष्यथः | गमिष्यथ | म. |
| गमिष्यामि | गमिष्याव | गमिष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अगच्छत् | अगच्छताम् | अगच्छन् | प्र. |
| अगच्छः | अगच्छतम् | अगच्छत | म. |
| अगच्छम् | अगच्छाव | अगच्छाम | उ. |

### आज्ञार्थ



| | | | |
|---|---|---|---|
| गच्छतु | गच्छताम् | गच्छन्तु | प्र. |
| गच्छ | गच्छतम् | गच्छत | म. |
| गच्छानि | गच्छाव | गच्छाम | उ. |

### विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| गच्छेत् | गच्छेताम् | गच्छेयुः | प्र. |
| गच्छे | गच्छेतः | गच्छथ | म. |
| गच्छेयम् | गच्छेव | गच्छेम | उ. |

## नम् (नमस्कार करणे ) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| नमति | नमतः | नमन्ति | प्र. |
| नमसि | नमथः | नमथ | म. |
| नमामि | नमावः | नमामः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| नंस्यति | नंस्यतः | नंस्यन्ति | प्र. |
| नंस्यति | नंस्यथः | नंस्यथ | म. |
| नंस्यामि | नंस्याव | नंस्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अनमत् | अनमताम् | अनमन् | प्र. |
| अनमः | अनमतम् | अनमत | म. |
| अलमम् | अनमाव | अनमाम | उ. |

### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| नमतु | नमताम् | नमन्तु | प्र. |
| नम | नमतम् | नमत | म. |
| नमानि | नमाव | नमाम | उ. |

## विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| नमेत् | नमेताम् | नमेयुः | प्र. |
| नमेः | नमेतम् | नमेत | म. |
| नमेयम् | नमेव | नमेम | उ. |

## वद् (बोलणे) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| वदति | वदतः | वदन्ति | प्र. |
| वदसि | वदथः | वदथ | म. |
| वदामि | वदावः | वदामः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| वदिष्यति | वदिष्यतः | वदिष्यन्ति | प्र. |
| वदिष्यति | वदिष्यथः | वदिष्यथ | म. |
| वदिष्यामि | वदिष्यावः | वदिष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अवदत् | अवदताम् | अवदन् | प्र. |
| अवदः | अवदतम् | अवदत | म. |
| अवदम् | अवदाव | अवदाम | उ. |

### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| वदतु | वदताम् | वदन्तु | प्र. |
| वद | वदतम् | वदत | म. |
| वदानि | वदाव | वदाम | उ. |

## विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| वदेत् | वदेताम् | वदेयुः | प्र. |
| वदेः | वदेतम् | वदेत | म. |
| वदेयम् | वदेव | वदेम | उ. |

# शृ (ऐकणे) परस्मैपद

## वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| शृणोति | शृणुतः | शृण्वन्ति | प्र. |
| शृणोषि | शृणुथः | शृणुथ | म. |
| शृणोमि | शृण्वः | शृण्मः | उ. |

## भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| श्रोष्यति | श्रोष्यतः | श्रोष्यन्ति | प्र. |
| श्रोष्यसि | श्रोष्यथः | श्रोष्यथ | म. |
| श्रोष्यामि | श्रोष्यावः | श्रोष्यामः | उ. |

## भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अशृणोत् | अशृणुताम् | अशृण्वन् | प्र. |
| अशृणोः | अशृणुतम् | अशृणुत | म. |
| अशृण्वम् | अशृण्व | अशृण्म | उ. |

## आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| शृणोतु | शृणुताम् | शृण्वन्तु | प्र. |
| शृणु | शृणुतम् | शृणुत | म. |
| शृण्वानि | शृण्वाव | शृण्वाम | उ. |

## विध्यर्थ



| | | | |
|---|---|---|---|
| शृणुयात् | शृणुयाताम् | शृणुयुः | प्र. |
| शृणुयाः | शृणुयातम् | शृणुयात | म. |
| शृणुयाम् | शृणुयाव | शृणुयाम | उ. |

## कृ (करणे) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| करोति | कुरुतः | कुर्वन्ति | प्र. |
| करोषि | कुरुथः | कुरुथ | म. |
| करोमि | कुर्वः | कुर्मः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| करिष्यति | करिष्यतः | करिष्यन्ति | प्र. |
| करिष्यसि | करिष्यथः | करिष्यथ | म. |
| करिष्यामि | करिष्यावः | करिष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अकरोत् | अकुरुताम् | अकुर्वन् | प्र. |
| अकरोः | अकुरुतम् | अकुरुत | म. |
| अकरवम् | अकुर्व | अकुर्म | उ. |

### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| करोतु | कुरुताम् | कुर्वन्तु | प्र. |
| कुरु | कुरुतम् | कुरुत | म. |
| करवाणि | करवाव | करवाम | उ. |

### विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| कुर्यात् | कुर्याताम् | कुर्युः | प्र. |
| कुर्याः | कुर्यातम् | कुर्यात | म. |
| कुर्याम् | कुर्याव | कुर्याम | उ. |

## कथ् (सांगणे) परस्मैपद

### वर्तमानकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| कथयति | कथयतः | कथयन्ति | प्र. |
| करोषि | कुरुथः | कुरुथ | म. |
| करोमि | कुर्वः | कुर्मः | उ. |

### भविष्यकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| कथयिष्यति | कथयिष्यतः | कथयिष्यन्ति | प्र. |
| कथयिष्यसि | कथयिष्यथः | कथयिष्यथ | म. |
| कथयिष्यामि | कथयिष्यावः | कथयिष्यामः | उ. |

### भूतकाळ

| | | | |
|---|---|---|---|
| अकथयत् | अकथयताम् | अकथयन् | प्र. |
| अकथयः | अकथयतम् | अकथयत | म. |
| अकथयम् | अकथयाव | अकथयाम | उ. |

### आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| कथयतु | कथयताम् | कथयन्तु | प्र. |
| कथय | कथयतम् | कथयत | म. |
| कथयानि | कथयाव | कथयाम | उ. |

### विध्यर्थ

| | | | |
|---|---|---|---|
| कथयेत् | कथयेताम् | कथयेयुः | प्र. |
| कथयेः | कथयेतम् | कथयेत | म. |
| कथयेयम् | कथयेव | कथयेम | उ. |





